# इच्छा पूर्ण करणारी छड़ी

उमर रेयारी, मराठी : अश्विनी बर्वे



बगदादच्या रस्त्यावर, जोहाला इच्छा पूर्ण करणारी एक लाकडी छड़ी मिळाली.

पण ती कशी काम करते?

जोहाने काही गोष्टी मागितल्या-पण त्याचा उलटाच परिणाम झाला. जेव्हा त्याने एका नवीन चपलेची इच्छा केली तेव्हा त्याचे जुने सॅन्डेल गायब झाले. जेव्हा त्याने एका गाढवावर बसण्याची इच्छा केली तेव्हा त्याच्याच पाठीवर गाढव पडलं.आणि जेव्हा सुलतानच्या हातात छडी गेली, तेव्हा तर अनेक गोष्टी वास्तवाच्या नियंत्रणा बाहेर गेल्या.

तो अजून त्रासात पडण्याच्या आधी, जोहाला छडीचे रहस्य कसे कळले?

# इच्छा पूर्ण करणारी छड़ी



उमर रेयारी

## लेखकाची नोट

जोहाच्या अरबी भाषेतल्या कहाण्या दुनियेत खूप आधीपासून माहित आहे. तिथं जोहा बुद्धिमान मूर्ख नसरुद्दीन होजाच्या रूपात प्रकट होतो. तुर्की, इराण आणि मध्य आशिया तील कहाण्यानंतर जोहा पश्चिमी साहित्यात सुद्धा सापडते. कारण सांचो पांजा, डॉन क्विक्सोटचा एस्क्वायर आणि प्रामाणिक साथीदार मिगुएल डी सर्वेंट्स, डॉन क्विक्सोटचे लेखक अल्जीयर्स मध्ये एक तुर्की कैद्याच्या रुपात काढलेल्या सहा वर्षात त्यांनी या कहाण्या ऐकल्या होत्या.

जोहाच्या कहाण्यामध्ये ज्ञान आणि मूर्खपणा यांच्यामध्ये एक तरल रेषा असते आणि त्यातून खूप काही शकू शकतो. म्हणून कदाचित फ्रैंकलिन डेलानो रूजवेल्टला जोहाच्या कहाण्या आवडत होत्या.









दिवस उन्हाचा होता आणि रस्ता लांब होता. जोहा, बगदादला जात होता. तो एक पडक्या भिंतीच्या सावलीत आराम करण्यासाठी थांबला.

“बघ सावलीत किती सुख वाटत आहे,” जोहाने स्वतःला म्हटले.



जोहा भिंतीला टेकून बसला. त्यामुळे जुन्या विटांची भिंत ढासळली. तो मागच्या बाजूला पडला जिथून त्याला भिंतीत लपवलेली सीलबंद बरणी दिसली. “मला आश्चर्य वाटतं की या बरणीत काय असेल,” जोहा म्हणाला. मग त्याने बरणीवरचे मेणाचे सील तोडले..



आत, त्याला एका चर्मपत्रात गुंडाळलेली छडी मिळाली.

जोहाने लेखपटावरील फिकट अक्षरे वाचली.

अनोळखी माणसा, तुला एक इच्छा पूर्ण करणारी छडी मिळाली आहे, तिचा समजदारीने उपयोग कर. ती छडी तुझ्या इच्छा पूर्ण करू शकते. "इच्छा पूर्ण करणारी छड़ी!" जोहाने म्हटले. “मला सगळ्यात आधी काय हवं आहे?” त्याने आपल्या झिजलेल्या चपलांकडे पाहिलं. “जर माझ्याजवळ नवीन चप्पल असती तर किती छान झालं असतं.”



जोहाने इच्छा पूर्ण करणारी छडी आपल्या हातात पकडून ठेवली होती. त्याने आपले डोळे थोडेसे मिटले. “जर माझ्याजवळ लाल कातड्याच्या चपलांचा एक जोड असता तर.”

मग त्याने आपले डोळे उघडले आणि खाली आपल्या पायांकडे बघितले.त्याच्याजवळ लाल कातड्याच्या चपलेचा जोड नव्हता. पण आता त्याच्याजवळ जुनी झिजलेली चप्पल पण गायब झाली होती.

जोहा रागाने ओरडला. ही कसली इच्छा पूर्ण करणारी छडी आहे. मी चपलेची इच्छा केली, आणि तिने माझी जुनी चप्पलच गायब केली. आता मला बगदादपर्यंत अनवाणी जावे लागणार.” जोहाने आपल्या हातातल्या छडी कडे बघितलं आणि ओरडला, “दुष्ट छडी! जर तू गायब झाली असती तर.”



पण छड़ी गायब होण्या ऐवजी त्याच्या हाताला चिकटली. त्यामुळे जोहा अजूनच भडकला. “या छडी मुले मी माझी चप्पल घालवून बसलो. आता मी तिच्यापासून सुटका होवू शकत नाही..” तो बग़दादला जाण्यासाठी रस्त्यावर चालू लागला.तो छडी हलवत आणि स्वतःशी बडबडत राहिला. “दुष्ट छडी! बेक्कार छडी! बकवास छड़ी!"

“रस्त्यातून बाजूला हो! निघ समोरून!” सुलतानच्या पहारेदारांची एक तुकडी मागून ओरडली. एक छोटे गाढव त्यांच्या घोड्यांच्या मागून चालत होते.जोहा घाईने रस्त्याच्या कडेला आला.

“सुलतानाचे पाहरेकरी सगळे बदमाश आहेत.त्यांच्याबरोबर पंगा न घेणं चांगलं,” जोहा स्वतःशी बडबडत म्हणाला, “तरी पण, जर माझ्याकडे गाढव असते तर मी त्याच्यावर बसून बगदाद पर्यन्तचा प्रवास करू शकलो असतो.”



पहारेदारांनी आपल्या घोड्याची लगाम खेचली. “तू ऐकलं का?” त्यांचा नेत्याने विचारले. “त्या माणसाला वाटतं की त्याच्याजवळ बगदादला जाण्यासाठी गाढव हवं. चला त्याची इच्छा पूर्ण करू या.”

“नाही, नाही!" जोहा ओरडला. “मी तर असं काही म्हणालो नाही.”

पण पहारेकऱ्यांना त्याची छेड काढायला मजा येत होती. त्यांनी जोहाला वाकायला सांगितले आणि मग त्यांनी आपले गाढव त्याच्या पाठीवर लादले. मग ते सर्व रस्त्यावरून पुढे जाऊ लागले आणि जोहा, गाढवाला उचलून त्यांच्या मागे मागे निघाला. रस्त्यावर सर्व लोक त्याला बघण्यासाठी उभे राहत. काय दृश्य होते!लोकांनी नेहमी माणसाला गाढवावर बसलेले पाहिले होते. कोणी गाढवाला माणसाच्या पाठीवर बसून प्रवास करतांना पाहिले नव्हते.

“थाड! थाड! गाढवाने लाथ मारली! बिचाऱ्या प्राण्याला माणसाच्या पाठीवरचा प्रवास पसंत आला नाही.



जेव्हा ते नगराच्या द्वारा पर्यंत पोहचले, तेव्हा सुलतानाच्या पहारेकऱ्यांनी जोहाला गाढवाला खाली ठेवायला सांगितले आणि आपल्या रस्त्याने जाण्याची परवानगी दिली. “मी आत्ता पर्यंत जे काही बोललो, त्यामुळे मी अडचणीत आलो आहे. ही सगळं त्या छडीची चूक आहे.”



शहरात प्रवेश करताच जोहाने शपथ घेतली, “मी आता कोणालाच एकही शब्द बोलणार नाही,” तो थोडासा दूर गेला तेव्हा त्याला रस्त्यावर एक मिरवणूक येतांना दिसली. सुलतान स्वतः त्या मिरवणुकीचे नेतृत्व करत होता.

"सुलतानाला दीर्घ आयुष्य मिळो, सुलतान अमर होवो!” जोहा सोडून मिरवणुकीत सगळे लोक ओरडत होते. पहारेकऱ्यांहे जोहाच्या गप्प बसण्याकडे लक्ष गेले. “काय आहे असं? तू सुलतानाच्या दीर्घ आयुष्याची कामना करत नाही का?”

जोहाने समजावलं, “आज मी जी इच्छा केली त्याच्या सगळं उलट होत आहे. मला भीती वाटते की जर मी सुलतानाच्या दीर्घ आयुष्याची इच्छा केली आणि त्याच्या उलट झालं तर.”

सुलतानाने पण जोहाचे बोलणे ऐकले. “घाबरू नको,” सुलतान म्हणाला. “जर तू माझ्या दीर्घ आयुष्याची कामना करू शकत नाही तर तू दुसरी अशी एखादी इच्छा कर चल कोणतीही छोटीशी इच्छा कर.ते पण चालेल.” मग सुलतानाने आपल्या नाकाच्या शेंड्यावरच्या मसा कडे इशारा केला. “हा मस मला एका आठवड्यापासून त्रास देत आहे.मी याच्यामुळे वैतागलो आहे.हा मस गायब होऊ दे.”

“मी आज कोणतीच इच्छा  करणार नाही,” जोहा म्हणाला.

“कदाचित तुरुंगात काही काळ काढल्यानंतर तुझं मत बदलेल?” सुलतानाने विचारले.

“नाही," जोहाने उत्तर दिले. मग त्याने एक दीर्घ श्वास घेतला.इच्छा पूर्ण करणाऱ्या छडीला त्याने पक्कं धरत त्याने म्हटलं, “जर सुलतानाच्या नाकावरचा मस गायब झाला तर.”



पण जसे त्याने ते शब्द म्हटले, “तो छोटा मस वाढू लागला. तो वाढतच गेला आणि शेवटी तो एका द्राक्षाच्या आकाराचा झाला. मग तो दोन भागात विभागला गेला. मस एकसारखा वाढत आणि फुटत गेला आणि शेवटी तो सुलतानाच्या नाकाखाली जांभळ्या द्राक्षाच्या घडासारखा लटकू लागला. पहारेकरी ओरडू लागले.

“या माणसाने सुलतानावर नक्कीच काहीतरी जादूटोणा केला आहे! त्याला पकडा! त्याचे डोके छाटून टाका!”



पहारेकरी जोहाला पकडण्यासाठी धावले. पण तो तिथून निसटून पळण्यात यशस्वी झाला. सुलतानाच्या पहारेकऱ्यांनी वर्तुळाकार गल्ल्यांच्या भूलभुलैय्या मध्ये त्याचा पाठलाग केला. जोहा अनवाणी पायांमध्ये होणाऱ्या वेदनेमुळे जास्त लांब पळू शकला नाही. लवकरच तो एका गल्लीत वळाला.त्याने एक दुकानाचा दरवाजा बघितला. दुकानदार समोर एक पुस्तक घेवून वाचत होता. जोहा धावत त्याच्याजवळ गेला.



“मला सुलतानाच्या पहारेकऱ्यां पासून लवकर वाचव!” त्याने दुकानदाराकडे भिक मागितली.

“इथे लप,”म्हातारा  दुकानदार म्हणाला. त्याने एका मोठ्या पेटीचे झाकण उघडले. जोहा त्यात लपला. दुकानदाराने पेटीचे झाकण बंद केले. लवकरच सुलतानाचे पहारेकरी गल्लीत येवून पोहचले.

“तू एका माणसाला इथून पळतांना बघितले का?” त्यांनी दुकानदाराला विचारले. “त्याच्या जवळ एक छडी आहे आणि त्याने चपल्या घातलेल्या नाहीत.”

म्हातारा दुकानदार म्हणाला, “मी असा कोणताही माणूस पहिला नाही,” मग पहारेकरी पुढे गेले.



मग दुकानदाराने जोहाला पेटीतून बाहेर येण्यास मदत केली.

“हा काय मामला आहे?” त्याने विचारले.

जोहाने त्याच्या बरोबर जे काय झाले होते, ते सगळं काही सांगितलं. जेव्हा पासून त्याला इच्छा पूर्ण करणारी मिळाली तेव्हापासून तो कमनशीबी झाला होता. जोहा रडत म्हणाला. “बरं झालं असतं मी ही जादूची छडी कधी बघितली नसती तर.”

"एक इच्छा पूर्ण करणारी छडी?” दुकानदार ओरडला. “ती तर खूप दुर्मिळ गोष्ट आहे. मी तिला बघू शकतो का?”

जोहाने छड़ी पकडून ठेवली होती आणि आता ती त्याच्या हाताला चिकटून बसली होती.

“यात काही आश्चर्य नाही की तुझं नशीब खराब होत आहे. ”दुकानदार म्हणाला. “बघ, तू तिला उलटं पकडलं आहे. तिचा टोकदार शेंडा पुढे हवा. जर तू छडी उलटी धरली तर तुझ्या इच्छाही उलट्याच होणार.”

“मग मी काय करायला हवं?” जोहाने विचारलं.

"छड़ी फिरवून पकड आणि मग एखादी इच्छा धर.”



जोहाने आता छड़ी बरोबर पकडली. आता तिचा टोकदार शेंडा पुढच्या बाजूला होता. “जर ही छडी माझ्या हातातून पडून गेली तर,” तो म्हणाला.

छड़ी लगेचच जमीनीवर पडली. जोहाने आपली बोटं पसरवली. त्याने यावेळी छडी योग्य पद्धतीने उचलली आणि म्हटलं, “जर माझ्याजवळ माझ्या जुन्या चपला परत आल्या तर.”

मग अचानक जुनी चप्पल त्याच्या पायात दिसू लागली. चपलेवर अजूनही धूळ लागलेली होती जशी त्याने ती कधी काढलीच नव्हती अशी.



म्हातारा माणूस म्हणाला, “जर तू हिचा योग्य उपयोग करायला शिकला तर ही एक अद्भुत वस्तू आहे.” तू एखादी इच्छा करण्याच्या आधी, तू सुलतानाकडे परत जायला हवे आणि त्याचे नाक ठीक करायला हवे. कारण ते काम करणं म्हणजे एक योग्य काम करणे होईल.”

जोहा त्यासाठी लगेच राजी झाला. त्याने म्हाताऱ्या माणसाचे आभार मानले आणि मग तो महालाकडे निघाला. तो पहारेकऱ्यांपासून लपून सुलतानाच्या सिंहासन कक्षात घुसला. सुलतान स्वतःला आरश्यात बघत होता आणि आपल्या कुरूप नाकाकडे टक लावून पाहत होता. अजूनपर्यंत मस, द्राक्षाच्या पिका सारखे दिसत होते.



“तू!" जोहाला बघून सुलतान जोरात ओरडला. “बघ! तू माझ्याबरोबर काय केले आहे!”

“मी हे ठीक करण्यासाठी परत आलो आहे,” जोहा म्हणाला.

त्याने टोकदार शेंडा पुढे ठेवून इच्छा करणाऱ्या छडीला धरलं आणि म्हटले.

“जर सुलतानाच्या नाकावरचा मस गायब झाला तर.”

आणि मग मस त्वरित गायब झाला. सुलतानाचे नाक परत चांगले नीट झाले.



सगळ्या लोकांनी जोहाची प्रशंसा केली आणि शुभेच्छा दिल्या. सुलतान विशेष प्रसन्न झाला. “ही खरंच इच्छा पूर्ण करणारी छडी आहे काय?” मी ही बघू शकतो का? सुलतानाने विचारले.

जोहाने आपली इच्छा पूर्ण करणारी छड़ी सुलतानाकडे सोपवली.

सुलतान म्हणाला, “मला नेहमी एक इच्छा पूर्ण करणाऱ्या छडीचे मालक व्हायचे होते.आता मी हिला आपल्या खजान्यात ठेवू शकतो.” त्याने आपल्या नोकराला बोलावले आणि आदेश दिला. “ही छडी माझ्या जवळच्या खोलीत नेवून ठेव. मी तिथे लगेच येतो.” मग सुलतानाने आपली दाढी कुरवाळली, म्हणाला, "मला नेहमीच इच्छा पूर्ण करणारी काठी हवी होती. आता मी ती माझ्या तिजोरीत ठेवू शकतो."



“पण ...," जोहा ओरडला. त्याला कधीही सुलतानाला आपली इच्छा पूर्ण करणारी छडी द्यायची नव्हती. सुलतान म्हणाला, “अच्छा तुला बदल्यात काय इनाम पाहिजे. ठीक आहे मी तुला एक इनाम देतो. सांग, तुला एक गाढव आवडेल?”

“हो, एक गाढव दिले तर खूप चांगले होईल,” जोहा म्हणाला.

सुलतानाने आपल्या पहारेकऱ्याकडून तबेल्यातून एक गाढव मागवले आणि ते जोहाला द्यायला सांगितले.

ते तेच गाढव निघाले जे जोहाने बगदादच्या पूर्ण रस्त्याभर उचलेले होते.

"अच्छा, गाढव!" जोहाने गाढवाच्या पाठीवर बसत म्हटले, “मी तुला एकदा उचलले होते. आता हे उचित होईल की तू मला उचलावे.”

जसा तो रस्त्यावरून जाऊ लागला, जोहाने गाढवाला विचारले, “गाढव, तुला काय वाटते मी परत जावून सुलतानाला सांगायला हवे का की छडी कशी पकडायची ते?”

“धाड! धाड!!“ गाढव ओरडले.

“मी तुझ्याशी सहमत आहे,” जोहा म्हणाला. “सुलतान स्वतःच त्याचा शोध घेवू शकतो.”





पण सुलतानाने तसे कधीच केले नाही.

समाप्त